महाराष्ट्र-कर्नाटक सीमाप्रश्न आंदोलनातील हुतात्म्यांच्या वारसांना निवृत्तीवेतन व इतर आर्थिक लाभ...

वित्तीय वर्ष २०२२-२०२३ मधील एप्रिल, २०२२ या महिन्याकरिता अनुदानाचे वाटप.

# महाराष्ट्र शासन

## सामान्य प्रशासन विभाग

**शासन निर्णय, क्रमांक : बियुडी-१८२२/प्र.क्र.१८/२०२२/३६**

नवीन प्रशासकीय भवन, मंत्रालयासमोर, मादाम कामा मार्ग,
हुतात्मा राजगुरु चौक, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक : २२ एप्रिल, २०२२

**संदर्भ :-**

१) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्र. बियुडी-१८१४/प्र.क्र.९६/२०१४/३६, दि.२१.०४.२०१५.
२) शासन पत्र, सामान्य प्रशासन विभाग, क्र. बीयुडी-२०२२/प्र.क्र.५२/२०२२/२५, दि.०६.०४.२०२२.
३) शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्र. अर्थसं-२०२२/प्र.क्र.४३/अर्थ-३, दि.०४.०४.२०२२.

**शासन निर्णय :-**

"महाराष्ट्र विनियोजन विधेयक, २०२२" (महाराष्ट्र विनियोजन अधिनियम, २०२२ यांच्या अनुसूचीच्या स्तंभ ४ मध्ये विनिर्दिष्ट करण्यात आलेल्या रकमांसह) यास विधानमंडळाने मंजूरी दिलेली असून महाराष्ट्राचे राज्यपाल यांनी त्यास अधिसंमती दिलेली आहे. माहे २०२२ चा महाराष्ट्र अधिनियम क्रमांक ५ म्हणून, महाराष्ट्र राजपत्र असाधारण भाग-४, दिनांक २८ मार्च, २०२२ मध्ये प्रसिध्द केले आहे. त्यानुसार उपरोक्त संदर्भाधीन क्र.२ व ३ च्या परिपत्रकान्वये सन २०२२-२३ या आर्थिक वर्षाच्या अनिवार्य व कार्यक्रम खर्चासाठी, एप्रिल २०२२ या महिन्याच्या तातडीच्या बांधिल खर्चासाठी तात्पुरती व्यवस्था म्हणून एकूण मंजूर वार्षिक तरतूदीच्या १०% मर्यादित खर्च भागविता यावा यासाठी विविध लेखाशीर्षाखाली अनुदान उपलब्ध करुन देण्यात आले आहे.

**२.** "मागणी क्र.ए-५, २२३५ - सामाजिक सुरक्षा व कल्याण, ६०-इतर सामाजिक सुरक्षा व कल्याण कार्यक्रम - १०२ - सामाजिक सुरक्षा योजनेखाली निवृतीवेतन- (००) (०३) महाराष्ट्र-कर्नाटक सीमा आंदोलनातील हुतात्म्यांचे वारसांना निवृत्तीवेतन (२२३५ २४९३)" या लेखाशीर्षाअंतर्गत सन २०२२-२०२३ या वित्तीय वर्षासाठी एकूण रु.१७,५७,०००/- (रुपये सतरा लाख सत्तावन्न हजार फक्त.) एवढी अर्थसंकल्पीय तरतूद मंजूर करण्यात आलेली आहे. त्यापैकी संदर्भ क्र.२ येथील दिनांक ०६.०४.२०२२ च्या शासन परिपत्रकान्वये माहे एप्रिल, २०२२ या महिन्याकरीता रु.१,७५,७००/- (रुपये एक लाख पंच्चाहत्तर हजार सातशे फक्त.) एवढी रक्कम उपलब्ध करुन देण्यात आली आहे.

**३.** महाराष्ट्र-कर्नाटक सीमा आंदोलनातील हुतात्म्यांच्या वारसांना स्वातंत्र्य सैनिकांप्रमाणेच रु.१०,०००/- दरमहा एवढे निवृत्तीवेतन व प्रती लाभार्थी रु.५००/- वार्षिक प्रवास भत्ता म्हणून संदर्भाधीन क्र.१ येथील दिमांक २१.०४.२०१५ च्या शासन निर्णयान्वये अनुज्ञेय आहे. सबब, प्राप्त अनुदानामधून माहे एप्रिल, २०२२ या एका महिन्याचा खर्च भागविण्याकरीता रु.१,४७,०००/- (रुपये एक लाख सत्तेचाळीस हजार फक्त.) इतके अनुदान महाराष्ट्र-कर्नाटक सीमा आंदोलनातील हुतात्म्यांच्या वारसांना निवृत्तीवेतन व वार्षिक प्रवास भत्ता अदा करण्यासाठी संबंधित जिल्हाधिकारी यांना पुढील तक्त्यात नमूद केल्याप्रमाणे वितरित करण्यात येत आहे :-

| अ. क्र. | जिल्हाधिकारी कार्यालयाचे नाव (लाभार्थ्यांची संख्या) | एप्रिल, २०२२ या एका महिन्यासाठी उपलब्ध तरतुदीतून वितरीत करावयाचे अनुदान | | |
|---|---|---|---|---|
| | | निवृत्तीवेतन (दरमहा रु.१०,०००/- प्रत्येकी) (रुपये) | प्रवासभत्ता (प्रत्येकी रु.५००/- वार्षिक( (रुपये) | एकूण अनुदान (३+४) (रुपये) |
| १ | २ | ३ | ४ | ५ |
| १ | मुंबई शहर (३) | ३०,००० | १,५०० | ३१,५०० |
| २ | कोल्हापूर (९) | ९०,००० | ४,५०० | ९४,५०० |
| ३ | पुणे (१) | १०,००० | ५०० | १०,५०० |
| ४ | रत्नागिरी (१) | १०,००० | ५०० | १०,५०० |
| | **एकूण अनुदान** | **१,४०,०००** | **७,०००** | **१,४७,०००** |

**४. सदर लेखानुदान पुढील अटींच्या अधीन राहून वितरीत करण्यात येत आहे:-**

१) एप्रिल, २०२२ या महिन्याचा खर्च संबंधित जिल्हाधिकारी यांनी त्यांना वितरीत केलेल्या तरतुदीइतका मर्यादित ठेवावा.

२) संबंधित जिल्हाधिकारी यांनी उक्त बाबीवर होणाऱ्या खर्चाची वेगळी नोंद ठेवून महालेखापाल कार्यालयामधील खर्चाच्या नोंदीशी ताळमेळ घालून त्याचे विवरणपत्र सामान्य प्रशासन विभाग/कार्यासन-२५ व वित्त विभाग यांच्याकडे विहित मुदतीत पाठवावे व त्याची प्रत या कार्यासनासदेखील पाठवावी. तसेच कुठल्याही परिस्थितीत “२२३५२४९३” या लेखाशीर्षाखालीच या रकमा खर्ची पडत असल्याची व त्याबाबत खर्चमेळाद्वारे खातरजमा करण्याची जबाबदारी संबंधित जिल्हाधिकारी यांची राहील, याची कृपया नोंद घ्यावी.

**५.** हा शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभागाचे पत्र क्र.बीयुडी-२०२२/प्र.क्र.५२/२०२२/२५, दि.०६.०४.२०२२ व वित्त विभागाचे परिपत्रक क्र.अर्थसं-२०२२/प्र.क्र.४३/अर्थ-३, दि.०४.०४.२०२२ मधील सूचना विचारात घेऊन निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा सांकेतांक २०२२०४२२१५१४४४६००७ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

LALIT NAMDEO SADAFULE

Digitally signed by LALIT NAMDEO SADAFULE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=GENERAL ADMINISTRATION DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=49d0b6bfb0d78bba142b040bbfdee534c7aa6db30b0e4d3a918fd1d910da93a1, pseudonym=CF7869D531604C280DB49A935EC5C18D7A958EAA, serialNumber=7BF3E1EAC0AB4A8E9144C78EA332CE94C22440C2D337AB6119823044B2D0A3AB, cn=LALIT NAMDEO SADAFULE
Date: 2022.04.22 15:15:29 +05'30'

**(ल.ना. सदाफुले)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत, माहिती व आवश्यक कार्यवाहीसाठी रवाना :-**

१. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) / महालेखापाल (लेखा परीक्षा) , महाराष्ट्र- १, मुंबई.
२. संचालक, लेखा व कोषागारे (संगणक शाखा), मुंबई.
३. प्रधान सचिव (व्यय) / लेखा व कोषागरे, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
४. जिल्हाधिकारी, मुंबई शहर जिल्हा, जुने जकात गृह, फोर्ट, मुंबई-२३.
५. जिल्हाधिकारी, रत्नागिरी, पुणे व कोल्हापूर.
६. जिल्हाधिकारी, मुंबई उपनगर जिल्हा, वांद्रे (पूर्व), मुंबई-५१ यांना असे कळविण्यात येते की, त्यांना आवश्यक असलेले अनुदान जिल्हाधिकारी, मुंबई शहर यांच्याकडून मागविण्यात यावे.

७. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
८. निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई.
९. जिल्हा कोषागार अधिकारी, रत्नागिरी, पुणे व कोल्हापूर.
१०. सामान्य प्रशासन विभाग / कार्यासन-२५, मंत्रालय, मुंबई.
११. निवड नस्ती (कार्या.३६).